

१ जानेवारी

**श्रोते पुसती कोण ग्रंथ। काय बोलिलें जी येथ।**
**श्रवण केलियानें प्राप्त। काय आहे।।** (१-१-१)

श्रीराम मंत्ररूप नांदी म्हणून श्रीसमर्थ रामदासस्वामींनी शिवथर घळीत हा समग्र ग्रंथ आपला सर्वोत्तम शिष्य कल्याणस्वामी यास सांगितला आणि त्याने तो लिहून घेतला. 'हा ग्रंथ कोणता आहे? ह्यात काय सांगितले आहे आणि तो ऐकल्याने कोणता लाभ होईल?' असे श्रोत्यांचे विविध प्रश्न कल्पून त्यांचे उत्तर एका ओवीत दिले आहे. **ग्रंथा नाव दासबोध। गुरुशिष्यांचा संवाद। येथ बोलिला विशद। भक्तिमार्ग।।** ह्या ग्रंथात नवविधा भक्ती आणि ज्ञान, वैराग्याचे लक्षण आणि अध्यात्मनिरूपण हे विषय समजावून दिले असून भक्तीमुळे मनुष्यांना देवाची प्राप्ती निश्चितपणे होते असा निर्वाळा दिला आहे. मुख्य भक्ती, शुद्ध ज्ञान, सायुज्य मुक्ती, आत्मस्थिती, मोक्षप्राप्ती, शुद्ध स्वरूप, विदेह स्थिती, अलिप्तपणा. मुख्य दैवत, मुख्य भक्त, जीवशिवपणा, 'मी कोण आहे?' या प्रश्नाचे उत्तर, उपासना, कवित्व, चातुर्य, मायोद्भव आणि पंचमहाभूतांचे लक्षण इत्यादींविषयी श्रोत्यांच्या नानाविध आशंकांचे निराकरण आणि आणखीही पुष्कळ गोष्टींचा निश्चयपूर्वक ऊहापोह या ग्रंथात केला आहे. त्यात एकंदर २० दशके असून प्रत्येक दशकात दहा समास आहेत. एकूण २०० समासांत समग्र व्यावहारिक तसाच पारमार्थिक बोध ह्या दासबोधात आहे. ह्या ग्रंथाचे आधारग्रंथ सविस्तर सांगून त्यानंतर रामदासस्वामींनी ह्या ग्रंथाची फलश्रुती वर्णन करून श्रोत्यांची मने आकर्षित करून घेतली आहेत. श्रुतिस्मृतिपुराणोक्त बहुतेक ग्रंथांचे सार दासबोधात आहे.

**दासबोध म्हणजे दासाला केलेला बोध, किंवा ''सद्गुरूचा दास हो म्हणजे बोध होईल'', असा सूचितार्थ.**



## २ जानेवारी

**नासे अज्ञान दुःख भ्रांती। शीघ्रचि येथें ज्ञानप्राप्ती।**
**ऐसी आहे फलश्रुती। इथे ग्रंथीं।।** (१-१-३०)

दासबोध ग्रंथ कोणत्या ग्रंथांवर आधारलेला आहे हे सांगून नंतर श्रीरामदास ह्या ग्रंथाच्या वाचनाने कोणते फल मिळेल हे सांगतात आणि श्रोत्यांची मने आकर्षित करून घेतात. ग्रंथ अर्धवट वाचून मत न ठरविता तो पूर्ण वाचून मगच त्याविषयी मत बनवा असे समर्थ रामदास विनयपूर्वक आणि विश्वासपूर्वक सांगतात. 'मीच शहाणा, दुसऱ्याला काय येते? माझेच म्हणणे खरे', असा खोटा अभिमान काहींच्या मनात असतो. परंतु तो अभिमान सोडून या ग्रंथातले जे आवडेल ते नीरक्षीरन्यायाने आपल्या अधिकारानुसार ग्रहण करावे.

ह्या ग्रंथाच्या श्रवणाने मनातील सर्व संशय एकदम नाहीसे होऊन वाचकांच्या आचरणात त्वरित चांगला बदल होईल. सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता ह्या भक्तीच्या चारही पायऱ्यांचे रहस्य कळून सायुज्य मुक्तीचा मार्ग सापडेल. 'अज्ञान, दुःख आणि भ्रांति' ह्या त्रिपुटीचा नाश होऊन तत्काळ ज्ञानप्राप्ती होईल. वैराग्य सत्यार्थाने अंगी बाणेल. विवेक म्हणजे सारासार विचार आणि सर्व प्रकारचे चातुर्य प्राप्त होईल.

हा ग्रंथ नित्यनियमाने वाचून चिंतन करणारे, मूळचे आळशी, अवगुणी व अवलक्षणी असले तरी नंतर सुलक्षणी आणि उद्योगशील, तसेच धूर्त, तत्त्वज्ञ, चतुर होतील आणि पाप्यांना पश्चात्ताप होऊन ते शुद्ध होतील. भक्तिमार्गाचे निंदकही भक्तिमार्गाचा अवलंब करतील. बद्ध असतील ते मुमुक्षू होतील. पतित असतील ते पावन होऊन त्यांना उत्तम गती मिळेल. सांसारिक माणसे अनेक संशयांनी, उद्वेगांनी त्रस्त असताता. ह्या सर्वांना त्यांच्या भावानुसार फळ लाभून मनाचे समाधान मिळेल.

**जयाचा भावार्थ जैसा। तयास लाभ तैसा।**



## ३ जानेवारी

**ॐ नमोजि गणनायका। सर्वसिद्धिफळदायका।**
**अज्ञानभ्रांतिछेदका। बोधरूपा॥** (१-२-१)

श्रीगणेशाला ग्रंथारंभी नमन करताना समर्थ रामदासस्वामींवर, ज्ञानेश्वरीच्या पहिल्या ओळीचा प्रभाव पडल्याचे जाणवते. प्रारंभ **ॐ नमोजि** असा व शेवटी **'आत्मरूपा'** ऐवजी **'बोधरूपा'** असे शब्द आले आहेत. दोन थोर संतांचे विचार कसे जुळतात ते यावरून दिसून येते. अर्थात समर्थ रामदासस्वामींसमोर सर्वांना योग्य मार्गाने नेणारा नायक म्हणजे नेता आहे. ज्यांची संख्या करता येते ते गण. श्रीगणेश हे देवगण, ऋषिगण, असुरगण, मनुष्यगण, प्रमथगण आदि सर्व गणांचे नायक आहेत. आठ मुख्य सिद्धी आहेत. त्यांचे फळ देऊन, संसार सत्य मानून, शरीर व आत्मा हे एकच मानणाऱ्या लोकांचा भ्रम नष्ट करणाऱ्या, सत्यज्ञानरूप, बोधरूप अशा श्रीगणेशाला नमस्कार केला आहे. ॐ म्हणजेच श्रीगणेश, तेच ब्रह्म; **ओमिति एकाक्षरं ब्रह्म** असे भगवद्‌गीतेत सांगितले असून ॐ तत्सत् असा त्याचा त्रिविध-निर्देश तेथे सांगितला आहे. ॐकार हे शब्दब्रह्म. त्यापासून सर्व अक्षरे, शब्द, साहित्य निर्माण झाले. 'अ' कार म्हणजे शब्दाची उत्पत्ती, 'उ' कार ओठ जवळ आणूनच म्हणता येतो ती स्थिती आणि ओठ मिटूनच म्हणता येणाऱ्या 'म' ची लयाची अवस्था. अ, उ, म यांचा एकत्र उच्चार म्हणजे ॐकार. तेच निर्गुण ब्रह्म. ॐकार आणि गणेश एक मानून प्रत्येक ग्रंथारंभी तसेच कार्यारंभी, तो विघ्नकर्ताही असल्यामुळे विघ्नांचे हरण करून त्याने सुखकर्ता व्हावे अशी प्रार्थना केली जाते. मुळाक्षरे म्हणताना श्रीगणेशाय नमः असे प्रथम म्हणतात.

**कोणत्याही क्षेत्रात आदर्श नेता होण्यासाठी श्रीगणेशाचे म्हणजे आदर्श नेत्याचे प्रतीक अशा गजमुखाचे गुण आत्मसात करावेत.**



## ४ जानेवारी

**ऐसा गणेश मंगळमूर्ति। तो म्यां स्तविला यथामती।**
**वांछा धरून चित्तीं। परमार्थाची।।** (१-२-३०)

ॐकार हे श्रीगणेशाचे निर्गुण स्वरूप. ॐ हा जर उभा लिहिला तर हत्तीच्या सोंडेसारखा आकार दिसतो. त्यावरून श्रीगणेश, गणपती, गणनायक आहे आणि त्याचे मुख हत्तीचे आहे म्हणून तो गजानन आहे, असे त्याचे सगुण रूप कल्पिले गेले. त्या मंगलमूर्तीला वंदन केल्यावर कार्य केले की सर्व रीतीने ते सफल होते. त्याच्या कृपेने विघ्ने चळाचळा कापू लागतात. विश्वभक्षक काळ दास होतो. हरिहरादि सर्व देव त्याला वंदन करतात. मंगळ ग्रहाची पीडा फार त्रासदायक असा समज आहे. परंतु त्या मंगळानेही श्रीगजाननापुढे शरणागती स्वीकारली आणि तुझ्या नावात माझे नाव प्रथम उच्चारले जावे असा वर प्राप्त केला. श्रीगणेशाच्या कृपेने अमंगळ तेही मंगळ होते. असा आहे मंगलमूर्ती मोरया. चौदा विद्या आणि चौसष्ट कला यांचा तो स्वामी आहे. श्रीरामदासांनी रचिलेल्या सुखकर्ता दु:खहर्ता० ह्या आरतीतील गणेशवर्णन आणि दासबोधातील गजानन स्तवन बरेचसे सारखे आहे. श्रीरामदासांचा गजानन दोन्ही डोळ्यांच्यामध्ये भ्रूमध्यावर ज्ञानचक्षू असलेला असा 'त्रिनेत्र' असून तो सरळ सोंडेचा आहे. तो वक्रतुंड म्हणजे वक्र असे जे दुष्ट दुर्जन, त्यांचे तुंडन करणारा म्हणजे नाश करणारा आहे. तो नृत्य, नाट्य, संगीत कलांत कुशल असून त्याच्या पायातील नूपुरे रुणुझुण आवाज करतात. तो चौदा विद्यांचा व चौसष्ट कलांचा गोसावी म्हणजे स्वामी आहे. आदर्श नेत्याला आवश्यक असलेले, दुसऱ्यांचे कोट्यवधी अपराध पोटात घालण्याची सहनशीलता, दूरदृष्टी वगैरे गुण गजाननाच्या ठायी आहेत. रामदासस्वामी त्यांच्याजवळ 'स्वार्थ' न मागता परमार्थ प्राप्ती मागतात. आपण सगळे स्वार्थ मागतो, हा भेद आहे. मानवी देहातील मूलाधार चक्राच्या ठायी गणेश सदैव असतो.

**स्वार्थ सगळेच मागतात, परमार्थाची मागणी करणारा विरळाच!**



## ५ जानेवारी

**आतां वंदीन वेदमाता। श्रीशारदा ब्रह्मसुता।**
**शब्दमूळ वाग्देवता। महामाया।।** (१-३-१)

"**कलौ चण्डीविनायकौ**" म्हणजे कलियुगात, महाकाली, महालक्ष्मी, महासरस्वतीरूप चंडी आणि वैशिष्ट्ययुक्त अनुपम नायक गणेश, विनायक, गजानन, ही दोनच दैवते कलियुगात जागृत आहेत. म्हणून त्यांची उपासना विशेष फलप्रद आहे. श्रीगणनायकाला वंदन केल्यानंतर वेदांची माता, ब्रह्मसुता, शब्दांचे मूळरूप वाग्देवता आणि महामाया कुंडलिनी शक्तिरूप शारदादेवीला श्रीरामदास नमन करतात. नमूं शारदा मूळ चत्वारि वाचा। असा स्पष्ट उल्लेख मनोबोधात पहिल्याच श्लोकात आहे. नाभिस्थानातून उमटणारी परावाणी, हृदयात स्फुरणारी पश्यंती, कंठातून अभिव्यक्त होणारी मध्यमा, आणि जिभेने बोलली जाणारी वैखरी या चार वाणी. मुका मनुष्य बोलू शकत नाही. त्याला आपले विचार खुणांनी दाखवावे लागतात. आपण बोलतो ते शारदेच्या कृपेने. ही शारदा सरस्वती जिभेच्या टोकावर नाचू लागली की साहित्याचे स्फुरण चढते. शारदा शब्दांचे अंतरंग उकलून दाखविते. योग्यांची विश्रांती, स्थितप्रज्ञांची निश्चयी बुद्धी, अशी शारदा ज्ञान आणि अज्ञान या दोन्ही उपाधी सोडून तर्कातीत, तुर्यावस्थेला अति संलग्न असते. ब्रह्मस्थितीला प्राप्त झालेला देहधारी पुरुष म्हणजे महापुरुष मानला तर त्याचे शब्द अपौरुषेय शास्त्रसदृश मानावे लागतात; कारण ते सिद्धसंकल्पाने शक्तियुक्त असतात. भारती किंवा शारदा ही त्या महापुरुषाची भार्या आहे. अशा महापुरुषाच्या वाचेमागून अर्थ धावतो. तो जे जे बोलतो ते ते घडतेच असा अनुभव आहे. शारदा शब्दमय आहे तर आत्मस्थितीमध्ये महाशून्य आहे. शारदा म्हणजे प्रकृती आणि माया यांचे एकत्रित रूप.

**वाणीवाचून शब्दार्थाची अभिव्यक्ती असंभव**
**तशीच अर्थावाचून वाणीही निरर्थक!**



## ६ जानेवारी

**जे परमार्थाचें मूळ। नातरी सद्विद्याचि केवळ।**
**निवांत निर्मळ निश्चळ। स्वरूपस्थिती।।** (१-३-१६)

तिसऱ्या समासात शारदेचे जे वर्णन मागे केले आहे त्यापुढे श्रीरामदास्वामी ह्या ओवीत त्याचा विस्तार करीत आहेत. ही शारदा परमार्थाचे म्हणजे मोक्षाचे मूळ आहे. ती सद्विद्या असून निवांत, निर्मळ, निश्चळ स्वरूपस्थिती आहे. महंताची शांती, ईश्वराची निजशक्ती, ज्ञानीजनांची विरक्ती, वैराग्याची शोभा आणि परब्रह्माशी अतिसंलग्न तुर्या अवस्था असलेली शारदा, अनंत ब्रह्मांडे घडविते अणि लीलेने ती मोडून टाकून आदिपुरुषात आदिप्रकृतीरूपाने दडी मारून राहाते. ती प्रत्यक्षात दिसली तरी विचारांती आढळत नाही. ब्रह्मादिकांना तिचा पार लागला नाही. तीच सर्व नाट्य, अंत:कला, निर्मळ स्फूर्तिरूप जाणीव असून तिच्यामुळेच स्वानंद अनुभविता येतो. ही शारदा ज्ञानशक्ती, सौंदर्याची शोभा आणि परब्रह्मरूपी सूर्याची प्रभा असून 'तत्त्वमसि' आदि महावाक्यांच्या आधारे संसाराचा त्वरित नाश करिते, संसारभ्रम दूर करिते. कलिकाळाची नियंती सद्गुरुकृपा तीच असून ती परमार्थमार्गावरील सारासार विचार निवडून दाखवून संसारसागराच्या पैलतीरी नेते, ती आपल्या शब्दसामर्थ्याने अनुभवाची खूण समजावून देणारी, प्राणिमात्रांत व्यापकरूपाने परिपूर्ण नटलेली अशी ही शारदा-सरस्वती असून वेद, वेदान्त, पुराणे तिचे अखंड स्तवन करतात. ती आहे जीवन्मुक्तांची सायुज्यता, अंतर्निष्ठांची आंतरिक स्थिती, आणि अनंत वैष्णवी माया. आपण जे जे दृष्टीने पहातो शब्दांनी ओळखतो, जे जे आपल्या मनाला भासते ते शारदेचे स्वरूप. स्तवन, भजन, भक्तिभाव, आदि साधनांना ह्या मायेचाच आश्रय घ्यावा लागतो. कारण, भक्त सद्गुरूशी एकरूप झाला की कोण कोणाचा भक्त, कोण कोणाची पूजा वा स्तुती करणार?

**स्वरूपाचा अनुभव आल्यावर परमार्थ दूर नाही.**



७ जानेवारी

**आतां सद्गुरु वर्णवेना। जेथें माया स्पर्शों सकेना।**
**तें स्वरूप मज अज्ञाना। काय कळे॥** (१-४-१)

श्रीरामदासस्वामींनी पाण्यात उभे राहून श्रीराम जय राम जय जय राम या मंत्राचा तेरा कोटी जप केला. तेव्हा श्रीरामांनी प्रत्यक्ष दर्शन देऊन त्यांना बोध केला. तेच रामदासांचे सद्गुरु. त्या सद्गुरूंना ते पुनः पुनः वंदन करतात. सद्गुरूंचे वर्णन करताना रामदास संपूर्णपणे तल्लीन झालेले दिसतात. आपले अंतरंग त्यांनी ह्या सद्गुरुस्तवनात ओतले आहे. ते म्हणतात, ''सद्गुरूंचे वर्णन करणे कठीण आहे. कारण सद्गुरूरूपी ब्रह्मस्वरूपाला माया (नामरूपात्मक जाणीव) स्पर्शही करू शकत नाही. मायातीत असे सद्गुरुपद अज्ञानी माणसाला कसे कळणार? श्रुतीसुद्धा सद्गुरुवर्णन करताना, 'नेति नेति' असे सांगून सद्गुरूंचे पूर्ण वर्णन करण्यास असमर्थ ठरते. कारण त्यांच्या रूपाला ना आदि ना अंत. म्हणूनच श्रीरामदास देहबुद्धीतूनच सद्गुरूंना नमस्कार करतात आणि विनवितात, ''मला पैलपार न्या''. मुख्य परमात्म्याचे यथार्थ आकलन होत नाही म्हणून उपासनेसाठी **'यथा मानवे तथा देवे'** या विचाराने त्याची प्रतिमा करावी लागते. देहबुद्धी आहे तोपर्यंत प्रतिमापूजन केले पाहिजे. सोऽहंभावाची निर्मिती आहे तोपर्यंत, उपासना चालविली पाहिजे. मात्र सोऽहंभाव मावळल्यावर उपासनासुद्धा सुटली पाहिजे. सद्गुरुरूप निर्गुण निराकार असले तरी रामदास मायाप्रभावाने सद्गुरूंच्या सगुण साकाररूपाचे वर्णन करतात. छांदोग्य उपनिषदात 'आचार्यवान् पुरुषो वेद' या सिद्धान्ताचे स्पष्टीकरण करताना एक दृष्टान्त दिला आहे. शरीररूपी वाळवंटात मूळ ईश्वरापासून दूर, हातपाय बांधून डोळ्यांवर मायेची पट्टी बांधून जीवात्म्याला सोडला की तो 'वाचवा, वाचवा', असा आक्रोश करतो. तेव्हा कामक्रोधादिकांची पट्टी सोडून हातपाय मोकळे करून, स्वदेशात जाण्याचा मार्ग दाखवितात ते सद्गुरू होत. मूळस्वरूपाकडे वाटचाल मात्र साधकालाच करावी लागते.

**सद्गुरूंचे वर्णन करणे अशक्य आहे हेच त्यांचे खरे वर्णन.**



८ जानेवारी

**हरिहरब्रह्मादिक। नाश पावती सकळिक।**
**सर्वदा अविनाशी येक। सद्‌गुरुपद।।** (१-४-२९)

सद्‌गुरू विश्वंभर आणि विश्वबीज आहेत. हरि, हर, ब्रह्मादि देव कल्पान्ती विनाश पावतात. परंतु जगात जर काही नित्य अविनाशी असेल तर ते आहे सद्‌गुरुपद. ध्रुवाप्रमाणे ते अढळ आहे. सूर्याचा प्रकाश दिवसापुरताच उपयोगी. म्हणून सदैव स्वयंप्रकाशी गुरूंना सूर्याची उपमा देता येत नाही. त्यांना परीस म्हणावे तर परिसाच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने होते परंतु त्या सोन्याला परिसत्व लाभत नाही. सद्‌गुरु तर शिष्याला तत्काळ आपणासारखा करतात. त्याला काळवेळाची बंधने नसतात. विभक्त नव्हे तो भक्त, म्हणजे भक्त सद्‌गुरुरूप होतो आणि अन्यजनांना तारून नेतो. लोखंडाचा मोठा गोळा पाण्यावर ठेवला तर तो बुडतो पण त्या लोखंडावर संस्कार करून आगबोट बनविली की ती स्वत: तरून दुसऱ्या लाखो प्रवाशांना पैलतीरी नेते. गुरूपदेशानंतर शिष्याची स्थिती अशीच होते. सागर खारट, सद्‌गुरु मधुर. आकाश व्यापक परंतु पंचमहाभूतांतले एक म्हणून विनाशी. याउलट सद्‌गुरु सर्वव्यापक व अविनाशी. पृथ्वीच्या सोशिकतेहून सद्‌गुरूंचे धैर्य अमर्याद. सूर्याचा प्रकाश मर्यादित तर सद्‌गुरूंचा ज्ञानप्रकाश अमर्याद. शेषनाग पृथ्वीचा भार धारण करतो परंतु त्याची उपमाही सदगुरूंना योग्य नाही कारण सद्‌गुरु जगाचा भार धारण करून शिष्याचा भार उतरवितात. **हरौ रुष्टे गुरुस्त्राता, गुरौ रुष्टे न कश्चन।** या उक्तीनुसार हरी आदि देव रागावले तर सद्‌गुरु रक्षण करतात परंतु सद्‌गुरु रागावले तर कोणीच त्राता नसतो. कबीर याच अर्थाने म्हणतात - गुरु गोविंद दोऊ खडे, किसके लागौं पायँ। बलिहारी गुरु आपने गोविंद दिया बताय। (कबीरसाखी गुरुदेव (४)). अलेक्झांडर दि ग्रेट म्हणायचा - ''माझ्या जन्मदात्या पित्याने मला स्वर्गातून खाली भूतलावर आणले, माझे सद्‌गुरु मात्र मला मोक्षपदी नेतील. मी त्यांनाच श्रेष्ठ मानतो.''

**सद्‌गुरुपद हे एकमेव अखंड, अनंत, अविनाशी आहे!**



## ९ जानेवारी

**आतां वंदीन सज्जन। जे परमार्थाचे अधिष्ठान।**
**जयांचेनि गुह्यज्ञान। प्रगटे जनीं।।** (१-५-१)

पाचव्या समासात, समर्थ रामदास परमार्थाला आधारभूत असलेल्या, गुह्य असे आत्मज्ञान जगात प्रगट करणाऱ्या सज्जन संतांना विनम्रपणे वंदन करतात. गंगा पापाचा नाश करते. चंद्र संताप हरण करतो. कल्पवृक्ष दैन्य, दारिद्र्य दूर करतो. परंतु ह्या थोर साधुसंतांची नुसती संगती धरली तरी त्यामुळे पाप, ताप आणि दैन्य या तिघांचाही नाश होतो. जीवात्म्याचे सत्यस्वरूप अत्यंत दुर्लभ. तेही संतसंगाने सुलभ होते. संतांच्या अंगावरून वाहणारा वारा ब्रह्मसमंधादींचे पाप नष्ट करतो. परब्रह्म प्रकट असले तरी स्थूल दृष्टीने ते कोणालाच दिसत नाही. परब्रह्म चर्मचक्षूंना दिसत नाही. त्याला पहाण्याचा प्रयत्न करता करता ते अंध होऊन आत्मवस्तूकडे पोहोचण्याचा रस्ता चुकले. दिव्याच्या साह्याने, नानाविध प्रकाशात, डोळ्यांत आंजन घालूनही परब्रह्म दिसत नाही. सोळा कलांनी युक्त चंद्र किंवा कलाराशि प्रखर सूर्यही हा आत्मवस्तू आपणास दाखवू शकत नाहीत. सूर्याच्या प्रकाशात लोकरीचा बारीक धागा किंवा कोळ्याच्या जाळ्यातला अगदी बारीक तंतू दिसतो, अणुरेणूसारखे सूक्ष्म पदार्थ दिसतात, एवढेच नव्हे तर केसाचे चिरलेले टोकही दिसते. असा त्या सूर्याचा प्रकाश ही परमात्मवस्तू दाखवू शकत नाही. परंतु ती साधुसंतांच्या संगतीने साधकांना प्राप्त होते. ज्या आत्मवस्तूच्या प्राप्तीसाठी प्रयत्न केला तर अनुमाने संपतात, प्रयत्न थकतात, तर्क मंदावतात, विवेक बलहीन होतो, शब्दांची बोबडी वळते, मन उपयोगी पडत नाही, भाषणपटु हजार तोंडांचा शेषही थकतो, सर्व ज्ञान प्रगट करणारे वेदही जी वस्तू दाखवू शकत नाहीत अशी वस्तू संतसंगतीत स्वानुभवाने कळते. अशा संतसज्जनांचा महिमा अगाध आहे.

**ज्याचे मन शांत तो खरा संत.**



१० जानेवारी

**जें त्रैलोक्याहून वेगळें। जे वेदश्रुतीसी नाकळे।**
**तेंचि जयाचेनि वोळे। परब्रह्म अंतरीं॥** (१-५-२५)

श्रीरामदासस्वामी संतांचा महिमा आणखी असा सांगतात - जे परब्रह्म त्रैलोक्याहून निराळे असून वेदश्रुतींना आकलन होत नाही, ते संतांच्या कृपेने अंतरंगात प्रगट होते. सद्गुरु हे संतच. पण आपणाला जो बोध देतो तो आपला सद्गुरु. मायेची शक्ती आश्चर्यकारक असली तरी ती परब्रह्माची ओळख करून देऊ शकत नाही. संत मात्र मायातीत अनंत परमात्म्याचा मार्ग सहज दाखवितात. परमात्मवस्तू हे संतांचेच स्वरूप आहे. त्यांचेही वर्णन करणे कठीण आहे. संत मोक्षाची विश्रांती, तृप्तीची नित्यतृप्ती, भक्तीची फलश्रुती, धर्माचे धर्मक्षेत्र, स्वरूपाचे सत्पात्र, पुण्याची पवित्र भूमी, समाधीचे मंदिर, विवेकाचे भांडार, आणि सायुज्य मुक्तीचे माहेर आहेत, असे विविध सार्थ दृष्टान्त देऊन श्रीरामदास संतांचे महत्त्व मनावर ठसवितात. कबीरदास म्हणतात - **संगत कीजे साधुकी। कभी न निष्फल होय। लोहा पारस परससे। सोभी कंचन होय।**

संतांनी क्रोध जिंकलेला असतो. काम, क्रोध आणि लोभ ही नरकात जाण्याची तीन दारेच; असे श्रीकृष्ण भगवान सांगतात. सामान्य व्यवहारी मनुष्याने क्रोध जिंकण्याचे सोंग केले तरी ते फार वेळ टिकत नाही. एका धार्मिक मनुष्याने काशीयात्रेला गेल्यावर, एखादी गोष्ट सोडतात, तसा क्रोध सोडला. घरी परतल्यावर गंगापूजन झाल्यावर त्याने लोकांना 'आपण काशीत क्रोध सोडला' असे सांगितले. लोक चकित झाले. परंतु त्या माणसाचा शेजारी चतुर होता. त्याने त्याच दिवशी निरनिराळ्या वेळी एकच प्रश्न त्याला विचारला - 'आपण काय सोडलंत ते कृपा करून पुन्हा सांगता का?' दर वेळी त्या माणसाचा क्रोध वाढत होता. परंतु वरकरणी तो शांती दाखवीत होता. अखेर मध्यरात्री उठवून शेजाऱ्याने तोच प्रश्न विचारला, तेव्हा तो रागाने बेभान होऊन किंचाळला - हज्जारदा सांगून समजलं नाही? 'त्यावर' तो शेजारी म्हणाला, ''माफ करा, आता नीट समजलं तुम्ही राग सोडलात ते!''

**''शम, विचार, संत्संगती आणि संतोष (तृप्ती) ही चार मोक्षद्वारे आहेत''**
**(योगवासिष्ठ मुमुक्षु प्रकरण, ११-५९)**



## ११ जानेवारी

**आतां वंदूं श्रोतेजन। भक्त ज्ञानी संत सज्जन।**
**विरक्त योगी गुणसंपन्न। सत्यवादी।।** (१-६-१)

रामदासस्वामी आपला श्रोतृवृंद भक्त, ज्ञानी, संत सज्जन, विरक्त, योगी, गुणी आणि सत्यनिष्ठ अशा अनेक प्रकारच्या अधिकारी श्रोत्यांचा आहे असे मानून त्यांना नमस्कार करतात. वक्त्याने ''मी काहीतरी मोठे तत्त्वज्ञान सांगणार आहे आणि ऐकणारे सगळे अज्ञ आहेत असा अभिमान धरू नये. उलट, त्यांचा अधिकार जाणून त्यांच्यापुढे नम्र व्हावे'', हेच रामदासांनी आपल्या विनयाने व्यक्त केले आहे. श्रोत्यांमध्ये कोणी अर्थामृताचे भोक्ते असतील तर काही प्रसंगी ते वक्त्याला स्फूर्ती देणारे, वक्त्याचे वक्ते असतील. काहीजण विविध संशयांचे निरसन करणारे निश्चयी पुरुष असतील. ज्यांची ग्रहणशक्ती आश्चर्यकारक असून जे ईश्वराचे अवतार आहेत असे किंवा प्रत्यक्ष देवच सभेत श्रोते म्हणून बसले असतील. असे मानतात की सुंदर कांडाचे वाचन चालू असेल तेथे मारुतीराय उपस्थित असतातच. त्यासाठी एक पाट वक्त्यापुढे ठेवला जातो. नाहीतर हनुमानाला सभेत उभे रहावे लागेल. एखाद्या सभेत शांत, सत्त्वस्थ अशा ऋषीश्वरांचा समुदाय बसलेला असेल तर त्यांच्यामुळे सभेला शोभा येते. वक्ता जे जे काही सांगावे असे मनात आणतो ते ते काही श्रोत्यांना पूर्वीच माहीत असते. म्हणून विनम्रपणे रामदास प्रार्थना करतात, ''नेहमी पंचपक्वान्नांचे भोजन करणारे लोक रुचिपालट करण्यासाठी साध्या भाजीभाकरीसारखे अवीट अन्न कधीकधी खातात. तशीच माझी ही प्राकृत वचने सज्जन श्रोते गोड करून घेवोत.''

**एका कानाने ऐकून दुसऱ्या कानाने सोडून देणारे श्रोते जगात अधिक सापडतात. अर्थारूढ मन श्रवण मनन। होय समाधान निजध्यास।।**



## १२ जानेवारी

**समर्थाचा पुत्र मूर्ख जगीं। परी सामर्थ्य असे त्याचे आंगीं।**
**तुम्हां संतांची मी सलगी। म्हणोनि करितों।** (१-६-१८)

आपापल्या शक्तीनुसार भक्तिभावपूर्वक परमेश्वराची पूजा करावी परंतु पूजासामग्री कमी आहे म्हणून पूजा करू नये असे नाही. रामदासस्वामी त्यानंतर अतिशय नम्र होऊन म्हणतात, "श्रोतेहो, मी एक वाक्-दुर्बल वक्ता आहे, तर आपण श्रोते परमेश्वरस्वरूप आहात. मी पद्धतशीर शास्त्राध्ययन केलेले नाही. विद्वत्ता, कला, चातुर्य, वक्तृत्व, कवित्व, भक्ती, ज्ञान, वैराग्य आणि बोलण्याचे माधुर्य यापैकी एकही गुण माझ्यात नाही. तरीही मी बडबड करून आपली पूजा करण्याचा यत्न करतो आहे. तुम्ही श्रोते प्रत्यक्ष जगदीश्वराच्या मूर्ती! तुमच्यापुढे माझी विद्वत्ता ती किती? मी निर्बुद्ध आणि मतिमंद असलो तरी तुमच्यापाशी सलगीने बोलत आहे. जगामध्ये एखाद्या थोर माणसाचा मुलगा मूर्ख असला तरी आपल्या वडिलांच्या बळावर त्याच्या अंगात काही सामर्थ्य असतेच. त्याप्रमाणेच सलगी करता करता मी तुम्हा संत श्रोत्यांचा झालो की संतपणा माझ्यात थोडातरी येईलच. वाघ-सिंहाना पाहून इतर लोक भिऊन पळतात. परंतु त्या वाघसिंहादींची पिल्ले अगदी निर्भयपणे त्यांच्या अंगावर खेळत असतात. तसेच मी तुम्हा संतांचा लेकरु असल्यामुळे माझी काळजी आपण करालच. तुमचे प्रेम माझ्यावर आहे त्यामुळे आपण माझे न्यून म्हणजे उणे, सहजच पुरे करून घ्याल. कारण तुम्ही संतसज्जन विश्वाचे मायबाप आणि मी तुमचे लेकरू आहे ही या दासानुदासाची प्रार्थना आहे.

**विद्या विनयेन शोभते** याचा प्रत्यय येथे येतो. एवढ्या प्रस्तावनेनंतर कोणता श्रोता वक्त्याला त्रास देईल? काही श्रोते मात्र वेगळेच असतात. असे सांगतात की एकदा तुकाराम महाराज कीर्तनात एवढे रंगले की सभेत शेवटी एकच श्रोता उरला. तरीही त्याबद्दल त्यांना धन्यता वाटली. तेव्हा तोच तो म्हणाला - माझी घोंगडी आपल्या पायाखाली अडकली आहे म्हणून थांबलो आहे.

**समर्थाच्या घरचे श्वान, त्यासी सर्वही देती मान।।**



१३ जानेवारी

**आतां वंदूं कवीश्वर। जे शब्दसृष्टीचे ईश्वर।**
**नातरी हे परमेश्वर। वेदावतारी।** (१-७-१)

ग्रंथरचना करण्यासाठी अंगी कवित्वशक्ती असली पाहिजे. 'कविर्मनीषी विद्वान्' या उक्तीनुसार कवी हा मनीषी, पंडित आणि विद्यासंपन्न असतो. कवीमध्ये अनेक गुण असतात. कवी हे शब्दसृष्टीचे ईश्वर, वेदरूपी परमेश्वर, सरस्वतीचे वसतिस्थान आणि अनेक कलांचे अथवा शब्दांचे मंदिर असतात. रामदासस्वामी कवींचे कार्य कोणते हे सांगून अशा व्यास वाल्मीकी आदींसारख्या थोर कवींना वंदन करतात. परमेश्वराची अगाध लीला आणि सत्कीर्ती यांचे वर्णन करण्यासाठी कवी निर्माण झाले आहेत. शब्दरत्नांचे समुद्र, मुक्तिरूपी मोत्यांचे सरोवर, अनेक प्रकारच्या बुद्धीच्या खाणी, अध्यात्म ग्रंथांच्या खाणी, तसेच बोलके चिंतामणी कवींच्या रूपाने निर्माण झाले. कवींविषयी बोलताना रामदासांच्या वाणीला अनेक दृष्टांतांचे स्फुरण आलेले दिसते. ते म्हणतात - 'कवी म्हणजे मनोरथ पूर्ण करणारे कल्पवृक्ष किंवा मोक्षाचे मुख्य ऐश्वर्य होय. सायुज्य मुक्तीचा विस्तार कविरूपाने झाला. आत्मबोध कविरूपाने सुलभ झाला. कवीश्वर हे मुमुक्षूंचे डोळे उघडणारे नेत्रांजनच जणू! ते साधकांना साधनमार्ग दाखवितात. ते स्वधर्माचे आश्रयस्थान असून, मनोजयाचा मार्ग दाखवितात. स्वधर्माचे रक्षण करणारे कवी, वैराग्याचे संरक्षण व भक्तांचे भूषणच असतात. कवींचा वाग्विलास सुरू झाला की श्रोत्यांचे कान रसांच्या आस्वादनाने तृप्त होतात. प्राचीन श्रेष्ठ कवींच्या काव्यामुळे काव्यरचनेचे ज्ञान पुढील कवींना होते. विद्वानांची योग्यता, सामर्थ्यवंतांची सत्ता आणि चतुर पुरुषांचे कौशल्यही कवी अनेकप्रकारे वर्णन करतात म्हणून ग्रंथारंभी त्यांना वंदन!

**नवनव-उन्मेषशालिनी प्रज्ञा म्हणजे प्रतिभा.**
**तिने युक्त ते खरे कवि! दुसरे केवळ नावाचे कवी!**



१४ जानेवारी

**कीं हे अमृताचे मेघ वोळले। कीं हे नवरसांचे वोघ लोटले।**
**नाना सुखाचे उचंबळे। सरोवर हे॥** (१-७-२८)

रामदास स्वामी कवींची महती विस्ताराने सांगतांना पुढे म्हणतात - कविरूपाने या जगावर अमृताने भरलेले मेघच वृष्टी करीत आहेत किंवा हे शृंगार, वीर आदि नवरसांचे प्रवाह वाहत चालले आहेत. किंवा त्यांच्यारूपाने सुखाचे सरोवरच जणू काय उचंबळले आहे. कवीश्वर होण्यासाठी केवढी मोठी विद्वत्ता अंगी असावी लागते ते समर्थ रामदासांनी या वर्णनाने सूचित केले आहे. कवित्वाचे नाना प्रकार, अनेक प्रकारच्या चाली, रचना, वृत्ते, गद्य-पद्यादि भेद आणि पदप्रास इत्यादी कवींनीच निर्माण केली. कवी म्हणजे ईश्वरी सृष्टीचे अलंकार; लक्ष्मीचा शृंगार आणि सकल सिद्धींचा निर्धार होत. त्यांच्यामुळे सभेला शोभा येते. कवी भाग्याचे भूषण असून सुखाचे संरक्षणकर्ते आहेत. देवांना नामरूप देणारे, ऋषींचा महिमा गाणारे कवी, शास्त्रांचे सामर्थ्य वर्णन करतात. महान कवींनी उत्तमोत्तम काव्ये लिहिली नसती तर जगाचा उद्धार कसा झाला असता? सगळ्या विद्याविषयांचे ज्ञान कवींच्या ग्रंथांमुळे होते. कवी चातुर्याच्या मूर्ती किंवा साक्षात् बृहस्पतीच होत. वेदस्मृती त्यांच्या मुखाने प्रकट होण्याची इच्छा करतात. कवींचे काव्य यशप्राप्तीसाठी, धनार्जनासाठी, लोकव्यवहार शिकविण्यासाठी 'शिवेतर' म्हणजे 'अमंगल' त्याचा नाश करण्यासाठी, उत्स्फूर्त संतोष निर्माण करण्यासाठी आणि एखाद्या प्रेमळ कांतेप्रमाणे कसे वागावे आणि कसे वागू नये याचा उपदेश करण्यासाठी आहे. महाकवींची काव्यरचना परमेश्वराच्या ब्रह्मांडरचनेहूनही श्रेष्ठ आहे. कुठे असले महाकवी आणि कुठे 'च वै तु हि' काव्य करणारे तथाकथित कवी! एक असाच कवी उत्तिष्ठोत्तिष्ठ राजेन्द्र। मुखं प्रक्षालयस्व टः। प्रभाते रोदिति कुक्कु-। अशा तीन ओळी लिहून झाल्यावर पादपूरणार्थ लिहितो - च वै तु हि च वै तु हि। कुक्कुटः शब्दातील टः तर त्याने दुसऱ्या चरणातच नेऊन टाकला!

**न देखे रवि वह देखे कवि - सूर्याच्या किरणांना मनुष्याचे अंतरंग दिसत नाही, परंतु कवी ते जाणू शकतात.**



## १५ जानेवारी

**नाहीं वैकुंठींचा ठाईं। नाहीं योगियांचे हृदईं।**
**माझे भक्त गाती ठाईं ठाईं। तेथें मी तिष्ठतु नारदा ।।** (१-८-१)

रामदासस्वामी कवीश्वरांना वंदन केल्यानंतर ग्रंथारंभी दासबोध ऐकणाऱ्या सभेचे स्तवन करतात. ही सभा भक्तिभावपूर्ण आहे. तिचे वर्णन करताना समर्थ रामदासांनी ज्या श्लोकाचा अनुवाद ह्या मराठी ओवीत केला आहे तो श्लोक असा आहे - **नाहं वसामि वैकुण्ठे योगिनां हृदयेऽपि वा। मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद।** श्रीविष्णू भगवान नारदाला सांगतात, ''मी एखादे वेळी वैकुंठात किंवा योगीजनांच्या हृदयात सापडणार नाही, परंतु माझे प्रेमळ भक्त जेथे माझे गुण गातात तेथे मी निश्चित निवास करतो.'' ज्या सभेत स्वत: जगदीश्वर उपस्थित असतो तेथे मुक्ती सुलभच असते. अशा कीर्तन-पुराणांचे निरूपण ज्या सभेत होते ती सभाच वंदनीय आहे. सभेचे श्रेष्ठत्व सांगतांना तीत उपस्थित सभासद कसे असावेत, त्यांचे आचरण कसे असावे, याचेही विवेचन रामदासस्वामींनी केले आहे. सभा राजकीय असली तरीही सभासदांची काहीतरी शैक्षणिक पात्रता असावी आणि सभेत कसे वागावे याचे नियम त्यांना माहीत असावेत. **आजकाल विधानसभेत किंवा लोकसभेत काही सदस्य जे निंद्य आचरण करतात, त्यांनी दासबोध ग्रंथ मूळ किंवा अनुवादरूपात अवश्य वाचावा.** आदर्श आध्यामिक सभेत प्रेमळ भक्तांची गायने, भगवत्कथा निरूपण, वेद व्याख्याने, पुराणवाचन, परमेश्वराचे गुणगान आणि अध्यात्मशास्त्रातील विविध विषयांची चर्चा निरंतर चालू असते. अशा सभेत भाविक, सभ्य, सात्त्विक, कृपाळू, निग्रही, तपस्वी, महायोगी वगैरे सभासद असतात.

**ज्या सभेत वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध नाहीत, ती सभाच नाही आणि धर्मनीती, सदाचरण सांगत नाहीत ते सत्यार्थाने वृद्ध नाहीत.**



१६ जानेवारी

**ऐसिये सभेचा गजर। तेथें माझा नमस्कार।**
**जेथें नित्य निरंतर। कीर्तन भगवंताचें॥** (१-८-२७)

आदर्श सभासदांचा निर्देश रामदास आणखी करून देतात. सिद्ध, साधू, साधक, मंत्र यंत्रांचा शोध घेणारे, निष्ठावंत, गुणग्राही, संतसज्जन, विद्वान, वेदवेत्ते शास्त्रज्ञ, महात्मे, समाधानी, व्युत्पन्न, दूरदर्शी, ब्रह्मतत्त्व व आत्मतत्त्व यांचे ज्ञाते, याज्ञिक, अग्निहोत्री, वैद्य, पंचाक्षरी, त्रिकालज्ञ, शुद्धचित्त इत्यादी प्रकारचे प्रमुख सभासद सभेला अलंकृत करतात. अशा सभांतून श्रोत्यांना उत्तमोत्तम विचार ऐकावयास मिळतात आणि योग्य गोष्टी ऐकल्याने त्यांचा उद्धार होतो. सभापतीला अशा सभेचा आणि सदस्यांचा अभिमान वाटतो. ज्या ठिकाणी सदा सर्वकाळ भगवंताच्या कीर्तनाचा गजर चालू असतो आणि हरिकीर्तन चालू असते अशा सभांना आणि त्या सभांतील सज्जन सभासदांना ग्रंथकार नमस्कार करतात. अशा आदर्श सभांत उपस्थित राहणाऱ्यांना उत्तम गती मिळते, कारण तेथे भगवत्स्वरूप संत असतात. कलियुगात तर सर्व उपासनांत व साधनांत कीर्तन श्रेष्ठ मानले आहे. वरिष्ठ ज्ञानी कीर्तनकारांची कीर्तने ऐकून मिथ्या संशय दूर होतात आणि उत्तमोत्तम संकल्प आणि विचार श्रोत्यांच्या मनात वाढीला लागतात. भारतात सध्या विविध कीर्तन-मंडळे असून त्यात चातुर्मास्य आणि अन्य उत्सवदिनी अशा कीर्तनांचा लाभ श्रोते घेत असतात, ही गोष्ट निश्चितच आनंददायी आहे.

**खरे वृद्धत्व पांढऱ्या केसावर नाही, तर ज्ञानावर ठरते. केवळ केस पांढरे झाले म्हणून मनुष्य खऱ्या अर्थाने वृद्ध होत नाही. तर जो ज्ञानी असतो तो वयाने लहान असला तरी खरा ज्ञानवृद्ध मानावा.**



१७ जानेवारी

**आतां स्तऊं हा परमार्थ। जो साधकांचा निजस्वार्थ।**
**नातरी समर्थांमध्यें समर्थ। योग हा।।** (१-९-१)

पहिल्या दशकाच्या नवव्या समासात रामदासांनी परमार्थाचे स्तवन केले आहे. परमार्थ हा साधकांचे स्वहित आहे अथवा सर्व योगांमध्ये अत्यंत श्रेष्ठ आहे. परमार्थ-योग व्यक्तीच्या आत्मशक्तीचा विकास म्हणजे परमार्थ. तो विचारशक्ती व एकाग्रता यांनी वाढीस लागतो. मन एकाच ध्येयाभोवती केंद्रित होऊ लागल्यावर आत्मशक्तीची वाढ होते. अशा प्रक्रियेलाच परमार्थात अनुसंधान म्हणतात. ध्येयाची सदैव स्मृती आणि हवे तेव्हा त्या ध्येयावर मन केंद्रित होणे हेच अनुसंधान. जेथे ईश्वरप्राप्ती हे ध्येय असते तेथे अशा परमार्थाचे कौशल्य आणि चिकाटी यांची विशेषच आवश्यकता असते. परमेश्वराच्या नामाचे अखंड स्मरण केले की साधकाला अभ्यासात प्रवीणता प्राप्त होते. अनुसंधानाची युक्ती साधली की कोणतेही कर्म करताना परमेश्वराचा विसर पडत नाही. वस्तुतः परमार्थ सुलभ असूनही सत्समागम न लाभल्याने तो अवघड झाला आहे. अन्य साधने कालांतराने फलद्रूप होतात तर परमार्थाने ब्रह्माचा साक्षात्कार तत्काळ होतो आणि वेदशास्त्रातले सार, आत्मज्ञानाचे रहस्य, प्रत्यक्ष अनुभविता येते. परब्रह्म सर्वत्र असूनही आपल्या चर्मचक्षूंना दिसत नाही कारण ते सर्वांपासून अलिप्त आहे. अत्यंत सूक्ष्म अशा आत्मतत्त्वातून विवेकाच्या मार्गाने, 'अहं' भाव सोडून पैलतीरी जाण्याचा मार्ग म्हणजे परमार्थ. तोच सर्वांचे सार, उत्तमोत्तम, अखंड, अक्षय आणि अपार आहे.

**परमार्थ साधला की जन्ममरणाच्या चक्रातून मुक्ती मिळते.**



## १८ जानेवारी

**अनंत जन्मींचें पुण्य जोडे। तरीच परमार्थ घडे।**
**मुख्य परमात्मा आतुडे। अनुभवासी॥** (१-९-२४)

अनंत जन्मांचे पुण्य जोडलेले असले तरच परमार्थ घडतो आणि मुख्य परमात्मा अनुभविता येतो. परमात्मा म्हणजेच परब्रह्म. त्याला राजाचे, अग्नीचे किंवा हिंस्त्र पशूचे भय नाही. ते जाग्यावरून उचलून नेता येत नाही किंवा ते स्वत: आपली जागा सोडीत नाही. ते चळत नाही, ढळत नाही. अक्षय, स्थिर, शाश्वत असे परब्रह्म आपल्या साध्या डोळ्यांनी दिसत नाही, परंतु सद्गुरुकृपेचे अंजन डोळ्यांत पडले तरच ते दिसते. परब्रह्म किंवा परमार्थ सामर्थ्यवंत योग्याचे ध्येय आणि परमगुह्य असते. शोधा म्हणजे गुरुच्या कृपेने सापडेल असा हा ठेवा आहे. परंतु इतरांना मात्र अगदी जवळ, स्वत:च्या हृदयात असूनही जन्मोजन्मी दुर्लभ झाला आहे. ज्याला अहं ब्रह्मास्मि - मीच ब्रह्म आहे असा साक्षात्कार होतो, आत्मज्ञान होते तो चौऱ्याऐंशी लक्ष जन्ममृत्यूच्या चक्रातून मुक्त होतो. विवेकाच्या सहाय्याने मायेचे निरसन होऊन त्याला सारासार विचार कळू लागतो. परब्रह्म स्वत:च्या अंत:करणात स्पष्ट दिसू लागते. ब्रह्माच्या जाणिवेत सर्व ब्रह्मांड बुडून जाते. प्रपंच खोटा वाटतो. सर्व संशय नष्ट होतात. दृश्य सृष्टीची जुनी जीर्णशीर्ण गोधडी विटते आणि कुजून नाहीशी होते. जो त्या दृष्टीने प्रयत्न करील त्याला परमार्थ साधणारा आहे. सात्त्विक जीवांना सत्संगतीने मिळणारा विसावा, जन्माचे सार्थक, भवसमुद्राच्या पैलतीराला नेणारा असा परमार्थ ज्याला साध्य झाला तो खरा राजा. ज्याने परमार्थ ओळखला नाही तो भिकारी. तो निरर्थक जन्मला. केवळ संसाराच्या खटाटोपात जन्म जो घालवितो तो मूर्ख समजावा. शहाण्याने परमार्थाने वागावे.

**आत्मसाक्षात्कार हे अनंत जन्मींच्या परमार्थाचे**
**अमृतासारखे मधुर फळ आहे.**



## १९ जानेवारी

**ऐसे हटनिग्रही कृतबुद्धी। जयास वोळल्या नाना सिद्धि।**
**ऐसे सिद्ध लक्षावधी। होऊन गेले।।** (१-१०-११)

जन्ममरणांच्या फेऱ्यात मनुष्याला जेव्हा नरदेह लाभतो तेव्हा त्याने परमार्थसाधना केली पाहिजे. अन्यथा मृत्यूनंतर अन्य योनीत जन्म येतो. परमार्थासंबंधी जी जी इच्छा धरावी ती दृढनिश्चयाने नरदेहात सफळ होते, म्हणून हा नरदेह धन्य, अपूर्व आहे. ज्यांनी अनेक सिद्धी प्राप्त केल्या आहेत असे हठनिग्रही, दृढनिश्चयी सिद्ध लक्षावधी होऊन गेले. त्यातल्या काहींनी कोणता मार्ग अवलंबिला त्याचे वर्णन श्रीसमर्थ रामदास असे करतात. 'काही जण भक्तिमार्गाचा स्वीकार करतात, तर कोणी गिरीकंदरी जाऊन कडकडीत वैराग्याचे पालन करतात. कोणी तीर्थयात्रा करू लागतात तर कोणी विविध मंत्रांची पुरश्चरणे करतात. कोणी अखंड नामस्मरण करतात तर कोणी तपश्चर्या अथवा योगाभ्यास करतात. कोणी वेदशास्त्रपारंगत होतात तर कोणी ईश्वर प्राप्तीसाठी उपासतापास करतात आणि धरणे धरतात. काहीजण भावबळाने देवाची प्राप्ती करून घेतात, तर कोणी प्रसिद्ध महात्मे होतात. कोणी आकाशात संचार करू लागतात, तर कोणी पाहता पाहता वायुरूप होऊन अदृश्य होतात; कोणी हिंस्र पशूंना आपले वाहन करतात तर कोणी अचेतन वस्तू चालवून दाखवितात. कोणी मृत देह जिवंत करतात तर कोणी सागराचे पाणी पिऊन टाकतात. कोणाला मन:सिद्धी तर कोणाला वाचासिद्धी प्राप्त होते. नवविधा भक्तीच्या राजमार्गाने जाणारे परलोकींचे हित साधून घेतात, तर योगी गुप्त मार्गाने ब्रह्मपदी जातात. आपापल्या उपासनेप्रमाणे इष्ट देवतेच्या लोकी जाऊन सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्य मुक्तीपैकी जी आवडेल ती मुक्ती प्राप्त करतात.

**मनुष्यजन्मातच मोक्षप्राप्ती शक्य आहे. अन्य कुठल्याही जन्मात नाही.**
**ज्यांनी अंतरात्मा जाणला ते खरे सिद्ध!**



## २० जानेवारी

**पशुदेहीं नाहीं गती। ऐसें सर्वत्र बोलती।**
**म्हणोनी नरदेहींच प्राप्ती। परलोकाची॥** (१-१०-२१)

नरदेह सर्व देहांमध्ये श्रेष्ठ का? या प्रश्नाचे उत्तर ह्या ओळीत आहे. अन्य प्राणिमात्रांना, पशुपक्ष्यादिकांना मनुष्याप्रमाणे प्रगल्भ बुद्धी नाही, वैखरी वाणी नाही, त्यामुळे ८४ लक्ष योनीमध्ये फक्त मानव देहातच परमार्थाचा लाभ होऊ शकतो. पशुदेहात जन्म लाभला तर नियमाला अपवाद म्हणून गजेंद्रादी काही उदाहरणे सोडली तर सद्गती प्राप्त होत नाही, असे सर्व शास्त्रग्रंथ सांगतात. जे जे उद्धरून गेले ते ते नरदेहातच. मनुष्य देहाचा योग्य उपयोग करून कोणी संत झाले तर कोणी महंत. ऋषी, मुनी, सिद्ध, साधू, भक्त, मुक्त, ब्रह्मज्ञ, विरक्त योगी तपस्वी, तत्त्ववेत्ते, ब्रह्मचारी, संन्यासी इत्यादी अनेक थोर लोक, नरदेहाचा लाभ झाला तेव्हाच झाले. ज्ञानेश्वरादी संत श्रीमुद्गलादी श्रेष्ठ मुनी, जनार्दन स्वामींसारखे सिद्ध पुरुष, ध्रुव प्रल्हादासारखे भक्त, शुक्राचार्यांसारखे पूर्ण विरागी, चांगदेवांसारखे योगी, एकनाथादी संत, याज्ञवल्क्यांसारखे तत्त्वज्ञ, इत्यादी थोर विभूती नरदेह लाभूनच मुक्त झाल्या. पशुदेह लाभूनही मुक्ती लाभलेल्या गजेंद्रासारख्यांच्या गोष्टी अपवादात्मक. त्यामुळेच पशुपक्ष्यादी देहांमध्ये मुक्ती किंवा सद्गती मिळणे कठीण, हा नियम सिद्ध होतो. पशुपक्ष्यांना नामजप वैखरी वाणीने करता येत नाही. परंतु नामजप ऐकता येणे शक्य आहे. म्हणून काही भक्त मोठ्या आवाजात नामस्मरण करतात. ते वातावरणातील पशु पक्षी, कीटक यांच्या कानावर पडून त्यांचा उद्धार व्हावा ही उदार भावना त्यामागे असते.

**ज्ञान व विचारशक्ती हा मनुष्याचा मोठा ठेवा आहे.**



## २१ जानेवारी

**नरदेह हा स्वाधेन। सहसा नव्हे पराधेन।**
**परंतु हा परोपकारीं झिजवून। कीर्तिरूपें उरवावा।।** (१-१०-२५)

दुर्लभ, अमोल असा हा नरदेह बहुधा स्वाधीन असतो. सहसा पराधीन होत नाही. म्हणूनच त्याला परोपकारात झिजवून कीर्तीरूपाने तो उरवला पाहिजे. ज्यांच्या यशोरूपी देहाला वार्धक्य आणि मृत्यूपासून उत्पन्न होणारे भय नसते, अशा रससिद्ध कृतार्थ कवीश्वरांचा जयजयकार असो, असे जे सुभाषित आहे त्याचा हेतू हाच आहे. म्हणूनच हा देह समर्थ आहे तोपर्यंत त्याचा अत्याधिक उपयोग करून घेतला पाहिजे. परोपकारात देह झिजवून मृत्यूनंतरही कीर्तीरूपाने तो अमर केला पाहिजे. नरदेह अव्यंग आहे, तोपर्यंत प्रयत्नांची पराकाष्ठा करावी. कारण अंगं गलितं पलितं मुण्डम् । दशनविहीनं जातं तुण्डम्। वृद्धो याति गृहीत्वा दंडं - अशी परिस्थिती झाली की त्या शरीराने काय साधणार? राम म्हणण्याऐवजी, (कृत्रिम दात बसविले नसले तर) लांब असा उच्चार यायचा - पांगळा धर्मयात्रा कसा करील? थोटा हाताने भजन कसे करील ? आंधळा ईश्वराची मूर्ती कशी पाहू शकेल? बहिरा परमेश्वराचे गुणगान कसे ऐकू शकेल? मुका भजन कसे करील? बऱ्याच तरुणांना अध्यात्म ज्ञान, आत्मज्ञान, तसेच भक्ती हे म्हातारपणी जोपासावयाचे विषय वाटतात. त्यांना हा उपदेश मोलाचा आहे. नरदेह धडधाकट आहे तेव्हाच तो सन्मार्गी लावला पाहिजे.

**मरावें परी कीर्तिरूपें उरावें!**



## २२ जानेवारी

**मृत्तिका खणोन घर केलें। तें माझें ऐसें दृढ कल्पिलें।**
**परी तें बहुतांचें हें कळलें। नाहींच तयासी।।** (१-१०-३४)

नरदेह धडधाकट आहे तोपर्यंत त्याला परमार्थाकडे न वळविणारा मूर्खच असतो. तो घर-संसारातच बद्ध होतो. नश्वराला अविनाशी मानतो. पूर्वी मातीची घरे बांधीत. घर माझे एकट्याचे आहे असे मानून मनुष्य त्याचे ममत्व मानतो परंतु ते घर अनेकांचे आहे हे त्या मूर्खाला कळत नाही. श्रीसमर्थांनी, सूक्ष्म दृष्टीने घरात माणसांखेरीज कोणकोणते प्राणी राहतात आणि त्या घराला आपलेच घर मानतात याची प्रदीर्घ सूची दिली आहे. उंदीर, पाली, माशा, कातण्या, मुंग्या, मुंगळे, विंचू, साप, झुरळे, भुंगे, कुंभारीण माशी, आळ्या, मांजरे, कुत्री, मुंगुसे, पादरे किडे, रातकिडे, वाळवी, पिसवा, ढेकूण, चाचड, तांबडे मुंगळे, केमरी, घुंघरडी, गांधील माशा, जंतू, गोमी इत्यादी प्राणी घर आपलेच मानतात. तसेच दासदासी, गोठ्यातील जनावरे, पाहुणे, मित्र, गावकरी हेसुद्धा, 'हे आमचेच घर' असे म्हणतात. चोर, सरकारी अधिकारी, आग, सगळेच ते घर आपले म्हणतात. अखेर संसाराने त्रस्त होऊन घरच नव्हे तर माणूस देशसुद्धा टाकून परागंदा होतो. त्यानंतर त्या मूर्खाने माझे माझे म्हटलेल्या घरात किडे, मुंग्या, वाळवी, साप वगैरे प्राणी रहातात. घरावरील ममत्व मिथ्या आहे असे स्वानुभवाने कळते. म्हणून जीवित हे दोन दिवसांची वसती मानावी. जी घराची अवस्था तीच मनुष्य देहाची. मनुष्यदेहात कोणकोण राहतात याचे सविस्तर वर्णन यापुढील भागात समर्थ रामदासांनी केले आहे.

**घर सर्वांचे दो दिवसांचे। ममत्व त्याचे दूर करा।**



२३ जानेवारी

**ऐसें शरीर बहुतांचें। मूर्ख म्हणे आमुचें।**
**परंतु खाजें जीवांचें। तापत्रैं बोलिलें।।** (१-१०-६०)

वरून गोंडस दिसणारे मानवी शरीर कातडी सोलल्यावर कसे दिसेल? अत्यंत किळसवाणे, शिवाय जीवात्मा शरीरात आहे तोपर्यंत शरीराला किंमत. त्यातला राम गेला की ते प्रेत होते. जिवंत असेपर्यंत आपण आपले शरीर एकट्याचेच समजतो. परंतु वस्तुतः त्यात कोणकोण राहतात आणि कोणाकोणाचा नरदेह हा भक्ष्य आहे याचा विचार करा. माणसाच्या डोक्यावरील केसात उवा आणि लिखा राहतात व रक्त पितात. केसांच्या मुळाशी अनेक जंतू राहतात. खांडूक झाले तर त्यात किडे पडतात. पोटात जंत व कृमी होतात आणि अन्नसत्त्व खाऊन टाकतात. दातांना, डोळ्यांना, कानाला कीड लागते. कानांत गोमाशा शिरतात. गोचिड्या रक्त खातात. चामवा मासांत घुसतात. पिसोळे एकदम चावून पळून जातात. गोमी व जळवा, रक्त पितात. विंचू, साप, फुरशी व घोणी, नरदेहाला दंश करतात. एखादेवेळी वाघाच्या तोंडी देह पडतो, अथवा लांडगा त्याला खाऊन टाकतो. देहाला उंट डसतात. देहाला हत्ती पायाखाली चिरडतात. बैल शिंगे मारून त्याला भोसकतात. चोर देहाचे तडातड तुकडे करतात. अनेक रोगजंतू देहात ठाण मांडून बसतात. अशा प्रकारे हे शरीर अनेक प्राण्यांचा खाऊ आहे. तापत्रयाने देह त्रस्त होतो. असा हा देह अनेक अपघातांतही मृत्यू पावून व्यर्थ जातो. परमार्थाचे सुख प्रपंचासक्त मूर्खांना काय कळणार? अशा मूर्खांची आणि पढतमूर्खांची लक्षणे आणि प्रदीर्घ सूची दुसऱ्या दशकात सविस्तर सांगितली आहे.

**माझे शरीर, माझी कांता, माझी मुले असे ''मे मे''**
**('माझे माझे') म्हणणाऱ्या मनुष्यरूपी बोकडाला**
**काळरूपी लांडगा केव्हाच खाऊन टाकतो.**



## २४ जानेवारी

**जे प्रापंचिक जन। जयांस नाहीं आत्मज्ञान।**
**जे केवळ अज्ञान। त्यांची लक्षणें।।** (२-१-७)

समर्थ रामदास दुसऱ्या दशकाच्या पहिल्या समासात मूर्खांची, तर दहाव्या समासात पढतमूर्खांची लक्षणे सविस्तर सांगतात. जे लोक केवळ प्रपंचात दंग असतात आणि आत्मज्ञानाच्या अभावी प्रपंचाविषयीही अज्ञानी असतात त्या मूर्खांची लक्षणेच प्रथम विचारात घेऊया. वैद्यक शास्त्रातील रोगनिदान हा विभाग वाचला की आपणाला त्यातले बहुतेक रोग झाले आहेत असा भास होतो आणि मन बेचैन होते. त्याचप्रमाणे समर्थ रामदासांनी वर्णिलेली मूर्ख लक्षणे वाचू लागले की आपणात त्यातली बहुतांश आहेत याची मनोमन खूण पटते आणि ह्या मूर्खपणातून कसे सुटावे हा विचार मनात स्फुरू लागतो. मूर्खांची लक्षणे असंख्य आहेत, परंतु त्यातली ठळक तेवढी येथे दिली आहेत. एक मनुष्य दुसऱ्याला मूर्ख म्हणतो तेव्हा आपणही कुठल्यातरी प्रकारचा मूर्ख आहोत हे त्याच्या लक्षात येत नाही.

१) ज्या मायबापांच्या पोटी जन्माला आला त्यांच्याशी आपल्या पत्नीच्या सांगण्यावरून वाकडेपणा धरून, बायकोलाच केवळ मैत्रीण, जिवलग मानून तिला गुप्त गोष्ट सांगणारा. २) सगळ्या आप्तेष्टांचा संबंध सोडून बाईलबुद्धीने तिलाच हितगुज सांगणारा. ३) परस्त्रीशी लघळपणा करणारा. ४) नित्य सासुरवाडीस जाऊन राहणारा. ५) कुलशीलाची पारख न करता केवळ सौंदर्यावर भुलून लग्नसंबंध जुळवणारा. ६) आपल्यापेक्षा श्रेष्ठ व्यक्तीची अहंकाराने बरोबरी करणारा. ७) सामर्थ्य नसताना सत्ता गाजविणारा. ८) आपली आपण स्तुती करणारा. ९) जगाला मोठ्या तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगत हाल अपेष्टा स्वदेशात भोगणारा. १०) तोंडाने वडिलांचा मोठेपणा गाणारा, परंतु स्वतःचा पुरुषार्थ नसणारा हे सर्व मूर्खच होत.

**अज्ञानाने आपणाला ज्ञानी आणि सर्वश्रेष्ठ समजणारा वस्तुतः मूर्ख असतो.**



२५ जानेवारी

**ऐसीं हीं मूर्खलक्षणें। श्रवणें चातुर्य बाणे।**
**चित्त देऊनियां शहाणे। ऐकती सदा।।** (२-१-७२)

ही मूर्ख लक्षणे ऐकून अंगात चातुर्य येते. याच समासात आणखी मूर्ख लक्षणे सांगितली आहेत. त्यांतली काही ठळक लक्षणे अशी आहेत - ११) कारणावाचून हसणारा. १२) बहुतेकांशी वाकडे असणारा. १३) आपल्या माणसांशी वैर आणि परक्यांशी मैत्री करणारा. १४) दुसऱ्यांच्या दोषांची चर्चा करणारा. १५) सुज्ञांच्या सभेत हातपाय ताणून झोपणारा. १६) परक्या ठिकाणी फार जेवणारा. १७) आपला मान-अपमान स्वत:च्या तोंडाने सांगणारा. १८) जुगार, वेश्यागमन, चोरी, (मग ती साधी किंवा आयकराची वा विक्रीकराची करणारा) चहाडी करणारा, परस्त्रीशी संबंध ठेवणारा, पक्ष्यांचे खेळ करणारा, कोल्हाटणींचे गाणे ऐकणारा ही सात किंवा परद्रव्य आणि परदारा यांचे व्यसन असणारा. १९) दुसऱ्यावर संपूर्णपणे अवलंबून राहून स्वत: काहीच प्रयत्न न करणारा. २०) घरात शहाणपणा शिकवून सभेत लाजणारा. २१) रोगाची बाधा असताना प्रौढीने औषध न घेणारा आणि घेतलेच तर पथ्य मुळीच न पाळणारा. २२) सोबतीवाचून परदेशात हिंडणारा. २३) दुसऱ्याच्या स्वभावाचा परिचय झाल्यावाचून संगत करणारा. २४) अपराधावाचून दंड करणारा. २५) क्षुल्लक गोष्टीत कृतज्ञता दाखविणारा. २६) देवलंड म्हणजे कुलधर्माची देवकार्ये न करणारा. २७) ताकद नसताना शिव्या देणारा. २८) घरात वाघोबा आणि बाहेर गोगलगाय बनणारा. २९) रस्त्याने खात खात जाणारा. ३०) उपकाराची फेड अपकाराने करणारा. ३१) रहदारीच्या मार्गावर शौचादी करणारा. ३२) दुर्बुद्धीने आत्महत्या करणारा. ३३) वैधृती, व्यतिपात अशा कुमुहूर्तावर प्रवासास निघणारा. ३४) परमेश्वराला विसरणारा, ३५) मद्य आदी निंद्य वस्तू सेवन करणारा. ३६) दुसऱ्यांची थट्टा करून आपली थट्टा केली तर चिडणारा. ३७) क्षणात बरा तर क्षणात वाईट वागणारा, हे सगळे मूर्खच.

**आपल्या कर्माची फळे आपण भोगतो, हे लक्षात न घेता संसारातील दु:खांमुळे देवाला शिव्या देणारा मूर्खच होय.**



## २६ जानेवारी

**लक्षणें अपार असती। परी कांही येक यथामती।**
**त्यागार्थ बोलिलें श्रोतीं। क्षमा केलें पाहिजे॥** (२-१-७३)

मूर्खलक्षणे सांगतांना, स्त्रीणां अष्टगुण: काम: । ह्या उक्तीचा, पुरुषाचेनी अष्टगुणे। स्त्रियांस ईश्वरी देणें॥ या शब्दांत रामदासस्वामींनी सूचकपणे उल्लेख केला आहे. जशी कामवासना तसेच पुरुषांच्याहून आठपट ऐश्वर्य स्त्रियांना असते, म्हणून अनेक बायका करणारा मूर्ख होय. स्त्रिया पुरुषांपेक्षा स्वाभाविकपणे अधिक मोहक असतात आणि लाघवी असतात. (म्हणून तर आधुनिक काळात जाहिरातीत कामुक मूर्खांचे लक्ष वेधण्यासाठी सुंदरींच्या विविध अंगप्रत्यंगांचे अश्लील दर्शन घडविणारे आविर्भाव दाखवितात - अर्थात हे अश्लाघ्यच होय.) आणखी मूर्ख असे - १) देव, गुरु, माता, पिता, ब्रह्मज्ञ आणि स्वामी यांच्याशी द्रोह, कपटाचरण करणारा, २) परदु:ख शीतल मानणारा, ३) न झेपणारी पैज मारणारा. ४) अंगावर उंची वस्त्र, अंगात ज्ञान आणि हातात शस्त्र नसताना सभेत पहिल्या रांगेत बेलाशक बसणारा. ५) पाहील ती वस्तू मागणारा. ६) पुष्कळ दिवसांचे जुने नोकर काढून नवे ठेवणारा. ७) हलक्या लोकांशी मैत्री करणारा. ८) डाव्या हाताने पाणी वा दूध पिणारा. ९) परमेश्वराऐवजी मनुष्याचा भरवसा धरणारा. १०) घरी सुंदर बायको असूनही नित्य परस्त्रीगमन करणारा. ११) दुसऱ्यासमोर डोके खाजविणारा. १२) दोघे बोलत असता मध्येच जाऊन बसणारा. १३) वाहत्या तीर्थात चूळ टाकणारा. १४) कुत्र्याला फार लाडावून अमर्यादपणे पाळणारा. १५) परस्त्रीशी भांडणारा. १६) मुक्या प्राण्यांना क्रूरपणे मारणारा. १७) भांडणतंटा पाहत उभा राहणारा. १८) श्रीमंतीत मागील ओळख विसरणारा. १९) अक्षरे गाळून वाचणारा. २०) पुस्तके काळजीने न जपणारा. २१) आपण स्वत: न वाचता दुसऱ्यालाही पुस्तके न देणारा, हे सगळे मूर्खच. रामदासस्वामी म्हणतात - ''ही मूर्ख लक्षणे यथामती सांगितली आहेत तरी त्यातली कोणाला ती लागू असतील तर त्याबद्दल श्रोत्यांनी क्षमा करावी.

**गणपति म्हणे वरेण्या, मूर्खांच्या संगतीं न लागावें।**



२७ जानेवारी

**प्रपंचविशीं सादर। परमार्थी ज्याचा अनादर।**
**जाणपणें घे अंधार। तो येक पढतमूर्ख।।** (२-१०-२७)

जो प्रपंचविषयक कामे अगदी मन लावून करतो परंतु परमार्थाच्या कार्याविषयी मनात नुसता आदरही ठेवीत नाही; कळत असूनही अंधाराच्या आडवाटेने जातो व आपल्या दोषांवर पांघरूण घालण्याकरिता आपमतलबी आधार दाखवितो तो एक पढतमूर्ख होय. शहाणा असूनही जो मूर्ख तो पढतमूर्ख. समर्थ रामदास विनम्रपणे सांगतात. 'श्रोत्यांनी दुःख न मानता ही लक्षणे जाणून त्यागावी व सुख प्राप्त करावे.' पढतमूर्खांची पन्नास-साठ लक्षणे दिली आहेत. समजते पण वळत नाही अशा पढतमूर्खांची पन्नास-साठ लक्षणे दिली आहेत. त्यातील काही ठळक लक्षणे विचारात घेऊया. ती उद्‌बोधक ठरतील. १) ज्ञानाच्या गोष्टी सांगून सगुण भक्तीचे खंडण करणारा. २) स्वधर्माची आणि साधनामार्गाची निंदा करणारा. ३) आपल्या ज्ञानाच्या घमेंडीने सर्वांना नावे ठेवणारा आणि प्रत्येकाचे उणे पहाणारा. ४) रज, तम, गुणांनी युक्त. ५) दुसऱ्याची तो श्रीमंत आहे म्हणून केवळ वाखाणणी करणारा. ६) ग्रंथ पूर्ण न वाचता उगीच त्याला नावे ठेवणारा. ७) उद्धटपणे नीतिमार्ग न अनुसरणारा. ८) अनावर क्रोध असणारा. ९) बोलण्याप्रमाणे न वागणारा. १०) पात्रता नसताना उपदेश करणारा. ११) हत्तीला कोळ्याच्या जाळ्याने बांधावे अथवा भुंग्याने कमळात गुंतून पडावे आणि मरावे, तसा स्नेहाने प्रपंचात गुंतणारा. १२) स्त्रियांनाच कथा निरूपण करणारा. १३) देह म्हणजेच मी अशी बुद्धी बाळगणारा. १४) देवाची स्तुती न करता माणसाची स्तुती करणारा. १५) स्त्रियांच्या अवयवांचे वर्णन करणारा अथवा नाटकी हावभाव करणारा. १६) प्रतिष्ठेसाठी लोकांना भविष्य सांगणारा. १७) रात्रंदिवस कथापुराणे ऐकूनही अवगुण न सोडणारा. १८) ज्यांचे आयुष्य संपले म्हणून प्रपंच हातचा गेला आणि परमार्थही किंचित्‌सुद्धा झाला नाही, ते सगळे पढतमूर्खच होत. बोले तैसा चाले। त्याची वंदावी पाउले।

**झोपलेल्याला जागे करता येते पण झोपेचे सोंग घेतलेल्याला जागे करता येत नाही, पढतमूर्खांच्या बाबतीत हे अगदी सत्य आहे.**



## २८ जानेवारी

**श्रोतीं व्हावें सावधान। आतां सांगतो उत्तम गुण।**
**जेणें करितां बाणे खूण। सर्वज्ञपणाची।।** (२-२-१)

'नको' ती लक्षणे त्यागावी आणि उत्तम गुण अंगीं बाणवावे असे रामदासस्वामी सांगतात. (इंग्रजीत अमुक करा व अमुक करू नका असे सांगणारी पुस्तके असतात तसाच हा उपदेश आहे.) समर्थ म्हणतात - ''श्रोत्यांनी सावध व्हावे. आता उत्तम गुण कोणते ते सांगतो. ते बाणल्याने सर्वज्ञपणाची खूण समजेल. कारण जो गुण आणि अवगुण दोन्ही जाणतो तो सर्वज्ञ समजावा.''

'काय करू नये' हे एकेचाळीस ओव्यात सांगितले असून त्याच्या उलट ते उत्तम गुण व ते आचरावे असे सांगितले आहे. 'हे करू नका' ही सूची मनाची पकड अधिक घेते. हे वर्णन विधिरूप किंवा निषेधरूप आहे. निषेधात जे दोष सांगितले आहेत ते त्यागिले की उत्तम गुण समजून त्यांचे ग्रहण करावे हा आशय आहे.

हे करू नये - १) परमार्थात सद्गुरूंना आणि व्यवहारात जाणत्याला वाट विचारल्याशिवाय कोठेही जाऊ नये. २) कोणतेही फळ ओळखल्याशिवाय एकदम खाऊ नये. (कदाचित प्राणांवर बेतेल). ३) रस्त्यात पडलेली वस्तू तिची पूर्ण चौकशी केल्याशिवाय एकाएकी घेऊ नये. (चोरीचा आरोप येईल किंवा स्फोटक वस्तू असेल तर प्राण जाईल.) ४) अतिवाद घालू नये. ५) तत्त्वबोध होणार नसेल तर उगीच भांडू नये. ५) कुलशील न पाहता स्त्रीशी विवाह करू नये. ६) विचार, उच्चार व आचार - पूर्ण विचार केल्याशिवाय करू नये. ७) वेद, शास्त्र, व्यवहार यांची मर्यादा सोडू नये. ८) आपल्या संबंधाचे प्रेम असल्याशिवाय कोणावर रागवू नये. ९) रात्री एकट्याने प्रवास करू नये. १०) लोकात वागताना लीनता सोडू नये. ११) अनीतीने मिळविलेले द्रव्य स्वीकारू नये. (कारण त्याने आपली मती भ्रष्ट होते.)

**तुटे वाद संवाद तो हीतकारी.**



२९ जानेवारी

**क्षणाक्षणां रुसों नये। लटिका पुरुषार्थ बोलों नये।**
**केल्याविण सांगों नये। आपला पराक्रमु।।** (२-२-११)

या उपदेशात रामदासांचे व्यावहारिक आणि पारमार्थिक चातुर्य दिसून येते.

हे करू नये ही सूची (पुढे चालू) १२) निंदा, शिव्या, यांचा वापर करू नये. (शिष्ट माणसेही 'च्यायला' ही शिवी एकसारखी वापरतात. ती शिवी आहे हेही त्यांना उमगत नाही हे दुर्भाग्य !) १३) परद्रव्य व परस्त्री यांचा अपहार करू नये. १४) वक्त्याला खवचटपणे अडचणीत टाकतील असे प्रश्न विचारू नयेत. १५) संतांविषयीं अंतर्यामी प्रेम कमी होऊ देऊ नये. १६) अतिक्रोध करू नये. लहानानेही शहाणपण शिकविले तर त्याचा अनादर करू नये. १७) प्रेम असेल तर पावलोपावली रुसू नये. १८) खरे तेवढे बोलावे, खोटे बोलू नये. १९) पराक्रम गाजविल्याशिवाय नुसती फुशारकी मारू नये. २०) आळसात जांभया देत बसू नये. २१) चहाडी ऐकली तर चौकशीशिवाय खरी मानू नये. २२) इंद्रियसुखाधीन होऊ नये. २३) परोपकारात कष्ट मानू नये. २४) हट्टाला पेटून पैज मारू नये. २५) प्रयत्न करणे सोडू नये. २६) परस्त्रीकडे पापबुद्धीने पाहू नये. २७) प्रसंगोपात्त दुसऱ्याचा उपकार घेतलाच तर तो पर्यायाने फेडल्याशिवाय राहू नये. २८) दुसऱ्याचा विश्वासघात करू नये. २९) बाहेर जाणाऱ्याला 'कोठे जातोस' असे विचारू नये. ३०) वस्त्र जीर्ण असले तरी मळके वापरू नये. ३१) लेखी पुराव्याशिवाय देवघेव करू नये. ३२) सभेच्या निर्णयाचा अनादर करू नये. ३३) आपल्या बोलण्याला मान नसेल तर उगीच बोलू नये. ३४) अति भोजन व अति निद्रा करू नये. ३५) गोष्ट सांगताना आपले आपणच हसू नये. ३६) मादक पदार्थ सेवू नयेत. ३७) भल्याचे दोष मनात आणू नये. ३८) व्यभिचार करू नये. ३९) दुसऱ्याचे उणे त्याच्या मागे बोलू नये. ४०) हरिभक्ती सोडू नये. ४१) कुलाचार सोडू नये. ४२) नवस फेडायला विसरू नये. ४३) सभेत समर्पक उत्तर देण्याचे टाळू नये. ४४) गुरूविना राहू नये. ४५) अपमार्गाला नेणारा गुरू करू नये. ४६) सत्य मार्ग सोडू नये. ४७) अपकीर्ती होईल असे काम करू नये. ४८) आपला भार दुसऱ्यावर टाकू नये.

**काय करावे व काय करू नये हे समजणे म्हणजे शहाणपण.**



## ३० जानेवारी

**ऐका कुविद्येचीं लक्षणें। अतिहीनें कुलक्षणें।**
**त्यागार्थ बोलिलीं ते श्रवणें। त्याग घडे॥** (२-३-१)

श्रीसमर्थ रामदासस्वामींनी दुसऱ्या दशकांतील या तिसऱ्या समासात. भगवद्गीतेतील आसुरी संपत्ती वर्णन करणाऱ्या श्लोकाच्या आधारे कुविद्यायुक्त माणसाचा परिचय करून दिला आहे. दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, पारुष्य (कठोरपणा), अज्ञान इत्यादी दोष आसुरी स्वभावाच्या व्यक्तीत आढळतात. मागील समासात 'मूर्खपण सांडावे दूरी। उत्तम गुणाची आवडी अंतरीं। म्हणोनि कृपाळूपणे बोले उत्तरीं। श्रीमदाचार्य शिकवण॥ अशी प्रापंचिकाची कुलक्षणे त्यागण्यासाठी सांगितली. त्यानंतर शुद्ध लक्षणे अशा पद्धतीने वर्णन केली की त्यांचा अभ्यास करता करताच जीव परमार्थाचा अधिकारी व्हावा. अशा उत्तम लक्षणांचा अव्हेर करणाऱ्या कुलक्षणी माणसाचे वर्णन येथे केले आहे. कुलक्षणी मनुष्य म्हणजे दोषांचे आगरच जणू!

परमार्थ-ग्रंथाचे वाचन वा श्रवण केल्याने कुलक्षणी माणसाचे डोके दुखते. दांभिकपणा, अभिमान, ताठा, राग, अज्ञान आणि कामवासना इत्यादिकांचा उन्माद, मोह, लोभ इत्यादी सहा शत्रू, तिरस्कार, अनादर, निंदा, रडकेपणा, खेद, कुतर्क, संशयखोरपणा इत्यादी कुविद्येची लक्षणे होत. दुष्टबुद्धी मनुष्य माझेपणा, विषयवासना, चिंता, अहंता, कामना, भावना (विषयचिंतन) असूया, अतृप्ती, लंपटपणा वगैरे दुर्गुणांनी युक्त असतो. तो कोणत्याही गोष्टीचा कीस काढतो, गावकुटाळकी करतो तो माजलेला असतो. तो जाणतेपणाचा वृथा अहंकार बाळगतो. तो अनेक स्पर्धा, खटपटी करतो. तऱ्हेवाईक, बडबड्या स्वभावाचा, चिडचिडा, लांडीलबाडी करणारा, अत्यंत रोगी असतो आणि नाना प्रकारच्या लटपटी करण्यात सदैव मग्न असतो.

**कुविद्यायुक्त जो नर। तो कुलक्षणांचे कोठार।**



## ३१ जानेवारी

**असो ऐसे नाना विकार। कुलक्षणाचें कोठार।**
**ऐसा कुविद्येचा नर। श्रोतीं वोळखावा।।** (२-३-३९)

आठव्या ओवीपासून विसाव्या ओवीपर्यंत रामदासांनी विकारांच्या जोड्या, 'आणि' या शब्दाचा उपयोग करून दाखविल्या आहेत. कुलक्षणी मनुष्य आळशी आणि खादाड, दुर्बळ आणि लाताड म्हणजे तिरसट असतो. तुसडा आणि लबाड, मूर्ख आणि तापट, वेडा आणि तोंडाळ, खोटा आणि शिवराळ, स्वत: न शिकणारा आणि अभ्यास न करणारा असतो. स्वत: अज्ञानी असतो आणि दुसऱ्यावर विश्वास ठेवीत नाही. स्वत: दोषी आणि दुसऱ्याचा दोषासाठी छळ करतो. स्वत: देवाची भक्ती करीत नाही आणि दुसरा करीत असेल तर त्याला ती पाहवत नाही. स्वत: पापी असूनही तो पुण्यवंतांची निंदा करतो. स्वत: दु:खी असून दुसऱ्यांची हिंसा करतो. हीन असून डामडौल दाखविणारा, नटवा, ढोंगी, रोगी, दुष्कर्मी, कृपण, अधर्मात रमणारा, लबाड, अविश्वासू, फांदे फोडणारा, स्वच्छंद तसाच बाष्कळ आणि स्वत: करंटा असूनही कुलक्षणी मनुष्य परोपदेश करतो. असा कुलक्षणी मनुष्य, भित्रा, उद्धट, निरुपयोगी आणि गर्वाने धुंद, भ्याड व पराक्रमाच्या बाता मारणारा, भ्रष्ट असून परद्वेष्टा, अभिमानी, अति निर्लज्ज, आणि उष्ट्या हातानेही कावळा न हाकलणारा असतो. अशा माणसाचे बोलणे कठोर कर्कश, कपटी, संशयजनक, दु:खप्रद, झोंबणारे, दुष्ट, दुसऱ्याचे उणे काढणारे, अनीतीचे, खोटे, बाष्कळ, आणि तुच्छतादर्शक असते. युक्ती, बुद्धी, आचार, क्रिया, सत्य, विवेक, भक्ती, भाव, ज्ञान, वैराग्य, शांती या सर्वांनी तो मनुष्य हीन असतो.

**सा विद्या या विमुक्तये। मोक्षप्राप्ती करून देते तीच खरी सुविद्या।**